महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/ कर्मचारी यांच्या सन २०१७-१८ या कालावधीतील वेतन व भत्ते खर्चाची प्रतिपूर्ती करण्यासाठी प्राधिकरणाला लेखाशिर्ष २२१५A०४१ अंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२२/प्र.क्र.२०२/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: २८ मार्च, २०२३

वाचा :-

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३.०३.२०१७.
२) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-१११७/प्र.क्र.२३५/पापु-२३, दिनांक ६.११.२०१७.
३) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.९०/पापु-२३, दिनांक २४.०१.२०२०.
४) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः बजेट-१४२२/प्र.क्र.२०२/पापु-२३, दिनांक ६.०२.२०२३.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. १६.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते तसेच निवृत्तीवेतन यांचे दायित्व शासनाने स्वीकारण्याचा व महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे जमा होणारे ईटीपी चार्जेस व तांत्रिक शुल्क शासनाकडे जमा करण्याचा धोरणात्मक निर्णय मंत्रीमंडळाने दिनांक १६.०३.२०१७ च्या बैठकीमध्ये घेतला असून त्यानुषंगाने संदर्भाधीन दिनांक २३.०३.२०१७ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते शासनामार्फत अदा करण्याच्या दृष्टीने आर्थिक तरतूद करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ६.११.२०१७ च्या शासन निर्णयान्वये २२१५A०४१ हे नवीन लेखाशीर्ष निर्माण करण्यात आले आहे.

२. सन २०१७-१८ या कालावधीमध्ये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या वेतनभत्तेसाठी एकूण रु.१४५.४५ कोटी एवढा खर्च प्राधिकरणाने केला होता. तथापि नवीन लेखाशिर्षांतर्गत प्रत्यक्ष निधीची तरतूद करण्यास लागलेल्या कालावधीमुळे सन २०१७-१८ मध्ये वेतनभत्तेसाठी प्राधिकरणाला पूर्ण निधीची रक्कम वितरीत करता आली नव्हती. त्या आर्थिक वर्षात प्राधिकरणाला शासनाकडून रु.३९.४२ कोटी इतका निधी प्राप्त झाला होता. उर्वरित रु.१०६.०३ कोटीपैकी रु.६५.०० कोटी इतका निधी संदर्भाधीन दिनांक २४.०१.२०२० च्या शासन निर्णयान्वये वितरीत केला आहे. उर्वरित रु.४१.०३ कोटी इतक्या निधीची प्रतिपूर्ती करण्यासाठी लेखाशिर्ष २२१५ए०४१ अंतर्गत रु.४१.०३ कोटी इतका निधी डिसेंबर, २०२२ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झाला आहे. सदर निधीपैकी ५० टक्के निधी संदर्भाधीन दिनांक ६.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत आले आहेत. वित्त विभागाने सन २०२२-२३ च्या सुधारित अंदाजामध्ये उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत निधीमध्ये कपात केली असल्याने सुधारित अंदाजाच्या मर्यादेत उर्वरित संपूर्ण निधी बीम्स प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता दिली असून सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला सन २०१७-१८ या कालावधीतील वेतन व भत्ते खर्चाची प्रतिपूर्ती करण्यासाठी अनुदान म्हणून "मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य/दत्तमत) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षांतर्गत रुपये १२,२७,६८,०००/- (अक्षरी रुपये बारा कोटी सत्तावीस लाख अडुसष्ठ हजार फक्त) इतकी रक्कम या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

अ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सन २०१७-१८ या कालावधीतील वेतनभत्तेसाठी प्राधिकरणाने त्यांच्याकडील घसारा निधीतून खर्च केला आहे. त्यामुळे शासनाकडून प्राप्त झालेला सदर निधी प्राधिकरणाने पुन्हा त्यांच्याकडील घसारा निधीमध्ये जमा करावा.

ब) सदर निधी घसारा निधी खात्यामध्ये जमा केल्याचे प्रमाणपत्र संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी शासनास सादर करावे.

क) वेतनभत्ते व इतर कोणत्याही थकबाकीसाठी सदर निधीचा वापर करु नये. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

२. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली रक्कम प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), श्री.राजेंद्र मडके, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तर श्री.रा.म. गेंगजे, उप सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. वितरीत केलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तीचे पालन करावे.

४. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च "मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२२-२३ च्या मंजूर आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ११८/व्यय-३, दिनांक १६.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाने संदर्भाधीन दिनांक १६.०३.२०२३ च्या परिपत्रकान्वये बिम्स प्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२८१६३९४५९४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB
BABASAHEB HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, pseudonym=ECB735300543A776F1DE714D85AF521F7953EAF5, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2023.03.28 16:57:03 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण

प्रत: माहितीस्तव,

वित्त विभाग, व्यय-३/ अर्थसंकल्प-१८ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
पापु-४ / पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.
निवडनस्ती, पापु-२३